**राष्ट्रीय कृषि विकास योजने अंतर्गत तुती लागवड कार्यक्रमास मान्यता प्रदान करणेबाबत..**

**महाराष्ट्र शासन**

सहकार,पणन व वस्त्रोद्योग विभाग

शासन निर्णय क्रमांक :- रेशीम १०११ / प्र.क्र.११७/रेशीम कक्ष,

मंत्रालय , मुंबई- ४०००३२

दिनांक:- २३ नोव्हेंबर, २०११.

**वाचा :** १) शासन निर्णय क्र. रेशीम १००६/प्र.क्र.२८/ रेशीम कक्ष , मंत्रालय, मुंबई -३२,दि.१२ जानेवारी २००९.

२) शासन निर्णय कृषि व पदूम विभाग क्रं.राकृवि-२०११/प्र.क्र.७४/राकृवियो कक्ष, मंत्रालय, मुंबई -३२ दि.२९ जुलै २०११.

३) शासन पत्र क्रमांक रेशीम १०११/ प्र.क्र.३९ / रेशीम कक्ष दि.०६ ऑगस्ट २०११ .

**प्रस्तावना :-**

जागतिक बाजारपेठेत रेशीम कापडाला प्रचंड प्रमाणात मागणी असून ,आजमितीला देशाअंतर्गत कापड निर्मितीकरिता लागणारे कच्चे सुत बाहेरील देशातून आयात करुन मागणी पुर्ण करावी लागत आहे. त्यामुळे राज्यात तुती लागवड करुन कोष उत्पादन वाढविण्यास प्रंचड वाव आहे. ही बाब लक्षात घेता बाराव्या पंचवार्षिक योजनेंमध्ये राज्यातील सध्याचे २,००० हेंक्टरवर असलेले तुती लागवड क्षेत्र १०,००० हेक्टरपर्यंत वाढविण्याचे निर्धारीत केलेले आहे.

सन २०११-१२ या वर्षात २२ जिल्हयामध्ये १२८० हेक्टर क्षेत्रावर तुती लागवड करण्याचे उद्दिष्ट असून सदर कार्यक्रम हा राष्ट्रीय कृषि विकास योजनेअंतर्गत राज्य रोजगार हमी योजनाच्या निकषाप्रमाणे राबविण्याचे प्रस्तावित आहे. हा कार्यक्रम राबविल्यामुळे ग्रामिण भागामध्ये वर्षभर सुमारे १६४०० बेरोजगारांना रोजगाराची संधी उपलब्ध होणार आहे. तसेच या कार्यक्रमातून कोषाचे उत्पादनात वाढ होवून सुत निर्मितीकरिता लागणा-या कच्चा मालाची मागणी पूर्ण करण्यास मदत होणार आहे. प्रस्तुत कार्यक्रम हा २२ जिल्हयामध्ये सन २०११-१२ ते २०१३-१४ या तीन आर्थिक वर्षात राबविण्याकरीता रु.६.४० कोटी निधी मंजुर करण्यात आला आहे. त्यापैकी सन २०११-१२ या वर्षासाठी मजूरीकरीता रु. १.९२ कोटी व साहित्याकरीता रु.२.५६ कोटी असे एकूण रु.४.४८ कोटी अनुदान कृषि विभागाने राज्यस्तरीय प्रकल्प मंजूरी समितीच्या कार्यात्तर मंजूरीच्या अधिन राहून शासन निर्णय दि. २९ जुलै २०११ अन्वये उपलब्ध करुन दिलेले आहेत व त्यास राज्य प्रकल्प मंजूर समितीने दि. १६ ऑगस्ट २०११ रोजी झालेल्या बैठकीत कार्योत्तर मंजूरी दिली आहे. प्रस्तुत कार्यक्रम राबविणेसंबधी मार्गदर्शक सुचना , अटी व शर्ती विहीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

राज्यात तुती लागवडीकरीता असलेला वाव व संधी लक्षात घेता, बाराव्या पंचवार्षिक योजनेत राज्यातील रेशीम उद्योगामध्ये पाच पटीने क्षेत्र वाढविण्याचे निश्चित केले आहे. तुती लागवड कार्यक्रम हा २२ जिल्हयामध्ये राबविण्यात येत आहे. सन २०११-१२ मध्ये १२८० हेक्टर नवीन तुती लागवडीचा लक्षांक **परिशिष्ट अ** मध्ये दर्शविल्याप्रमाणे निर्धारीत करण्यात आला आहे. या लक्षांकाकरिता राष्ट्रीय कृषि विकास योजनेंअंतर्गत सन २०११-१२ ते २०१३-१४ या आर्थिक वर्षात रु.६.४० कोटी निधी मंजूर करण्यात आला आहे. यापैकी सदर लक्षांककरिता सन २०११-१२ या वर्षासाठी मजूरीकरिता रु. १.९२ कोटी व साहित्याकरीता रु.२.५६ कोटी असे एकूण रु.४.४८ कोटी अनुदान राष्ट्रिय कृषि विकास योजने अंतर्गत खर्च करण्यास खालील परिच्छेदात नमूद केलेल्या मार्गदर्शक सुचना , अटी व शर्ती याचे अधिन राहून मान्यता देण्यात येत आहे.

२. **प्रस्तुत राष्ट्रीय कृषि विकास योजनेअंतर्गत तुती लागवड कार्यक्रम राबविणेकरीता संदर्भाधिन क्र.१ शासन निर्णय दि. १२ जानेवारी २००९ अन्वये विहीत केलेली खर्चाची मानंके , कार्यप्रणाली / मार्गदर्शक सुचना लागू राहतील.**

३. संदर्भ क्र.३ येथील दि. ६ ऑगस्ट २०११ च्या पत्रातील शेवटच्या परिच्छेदात कामाची प्रगती पाहून कोणत्या योजनेअंतर्गत अनुदानाचे वाटप करावयाचे आहे असे नमूद करण्यात आले आहे या अनुषंगाने अशी सुचना देण्यात येते की चालु वित्तीय वर्ष सन २०११-१२ मध्ये झालेले तुती लागवडीच्या अनुदानावरील खर्च राष्ट्रीय कृषि विकास योजनेमधून भागविण्यात यावा.

४. राष्ट्रीय कृषि विकास योजनेअंतर्गत तुती लागवडीच्या प्रस्तावास तांत्रिक मंजूरीचे अधिकार संबधित जिल्हा रेशीम विकास अधिकारी श्रेणी-१ व श्रेणी-२ यांना राहतील. तसेच प्रशासकीय मंजूरीचे अधिकार संबधित सहाय्यक संचालक यांना राहतील.मात्र चालु आर्थिक वर्षाचे तुती लागवडीच्या प्रस्तावांस जिल्हाधिकारी यांची प्रशासकीय मंजूरी प्राप्त असल्यास त्यास पुन्हा प्रशासकीय मंजूरी घेण्याची आवश्यकता नाही.

५. नवीन तुती लागवड कार्यक्रम हा जिल्हावार तयार करण्यात आलेल्या प्रकल्पाक्षेत्रात राबविण्यात यावा. सदर कार्यक्रमाची उद्दिष्टपुर्तता विहीत मुदतीत पूर्ण करण्याची जबाबदारी संबधित रेशीम विकास अधिकारी श्रेणी-१ /श्रेणी-२ व सहाय्यक संचालक यांची राहील. संचालक (रेशीम) हे नियंत्रक अधिकारी राहतील

७. प्रस्तुत अनुदान हे लाभार्थ्यांना त्यांचे बँक खातेवर रेखांकीत धनादेशाद्वारे अदा करणे अनिवार्य राहील.

८. राष्ट्रीय कृषि विकास योजनेअंतर्गत सदर कार्यक्रम राबविणेसाठी प्राप्त झालेला निधी वितरीत करण्यासाठी संचालक (रेशीम) नागपूर यांना प्राधिकृत करण्यात येत आहे. त्यांनी लाभार्थ्यांना देय असलेले अनुदान आहरण व संवितरण अधिकारी म्हणून संबधित रेशीम विकास अधिकारी श्रेणी.-१ व श्रेणी-२ यांचे नांवे वितरीत करावे. याबाबत प्राप्त झालेला निधि व त्याचा विनीयोग स्वंतत्रपणे विहीत केलेल्या लेखापध्दतीनूसार ठेवण्यात यावा. याबाबत उपयोगीता प्रमाणपत्र कृषि विभागामार्फत केंद्र शासनास पाठवायचे आहे. तरी संचालक (रेशीम ) यांनी उपयोगीता प्रमाणपत्रे या विभागास पाठवावे.

९. सदर शासन निर्णय कृषि व पदूम विभागाच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

१०. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०१११२३०७५९४०००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने. सही/-

**सोबत: सहपत्र परिशिष्ट-अ**

**( प्र.बा.कडवे)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत-

प्रधान सचिव( कृषि) मंत्रालय, मुंबई -३२
उपसचिव (कृषि) तथा सदस्य सचिव, राष्ट्रीय कृषि विकास योजना कक्ष, कृषि व पदूम, मंत्रालय, मुंबई -.३२.
संचालक, रेशीम संचालनालय, नागपूर.
महालेखापाल, महाराष्ट्र १ /२ , (लेखा व अनुज्ञेयता) लेखा परीक्षा , मुंबई /नागपूर.
आयुक्त (कृषि) कृषि आयुक्तालय, म.राज्य , पुणे
व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य छोटया शेतक-यांचा व्यापारी संघ , पुणे
संचालक, कृषि प्रक्रीया व नियोजन , कृषि आयुक्तालय, म.राज्य पुणे
सहाय्यक संचालक, प्रादेशिक रेशीम कार्यलय नागपूर/ अमरावती/औरंगाबाद/ पुणे.
सर्व रेशीम विकास अधिकारी
रेशीम कक्ष निवड नस्ती.

**परिशिष्ट -अ**

**राष्ट्रीय कृषी विकास योजने अंतर्गत तुती लागवडीबाबत जिल्हानिहाय लक्षांक**

**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, शासन निर्णय क्र. रेशीम-२०११ /प्र. क्र.११७/रेशीम कक्ष**

**दिनांक : २३ नोव्हेंबर, २०११ चे सहपत्र**

| अ.क्र. | जिल्हा | लक्षांक (हेक्टरमध्ये) |
|---|---|---|
| १ | पुणे | ८० |
| २ | सांगली | ८० |
| ३ | सातारा | ८० |
| ४ | सोलापूर | ८० |
| ५ | कोल्हापूर | ४० |
| ६ | अहमदनगर | ८० |
| ७ | नाशिक | ४० |
| ८ | अमरावती | ४० |
| ९ | यवतमाळ | ४० |
| १० | बुलढाणा | ८० |
| ११ | वाशिम | ४० |
| १२ | वर्धा | ४० |
| १३ | नागपूर | ४० |
| १४ | औरंगाबाद | ८० |
| १५ | जालना | ८० |
| १६ | परभणी | ४० |
| १७ | हिंगोली | ४० |
| १८ | नांदेड | ४० |
| १९ | लातुर | ४० |
| २० | उस्मानाबाद | ८० |
| २१ | बीड | ८० |
| २२ | अकोला | ४० |
| | **एकुण** | १,२८० |

सही/-
( प्र. बा. कडवे )
अवर सचिव, महाराष्ट्र शासन
सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग